**महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाकडून शासकीय/ निमशासकीय कार्यालयांना कापड पुरवठा करण्यासाठी कार्यपद्धती निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक कापड-२०-१९/प्र.क्र.२६८/टेक्स-२**

१६ वा माळा, नवीन प्रशासकीय भवन,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-२ डिसेंबर, २०१९

<u>वाचा :-</u>
१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. कापड २०१२/प्र. क्र. ३३/ टेक्स-४, दि. ३ मार्च, २०१२
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस/२०१४/प्र.क्र. ८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. भांखस/२०१९/प्र.क्र. ३६/उद्योग-४, दिनांक १७ सप्टेंबर, २०१९

<u>प्रस्तावाना</u> :-

विविध शासकीय/ निमशासकीय कार्यालयांना लागणाऱ्या कापडाचा पुरवठा महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाकडून वाचा क्र. १ येथील शासन निर्णयान्वये ठरवून दिलेल्या कार्यपद्धतीनुसार करण्यात येत होता. आता , उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने वाचा क्र. २ येथील शासन निर्मयानुसार शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची सुधारित नियमपुस्तिका तयार केली आहे. तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने वाचा क्र. ३ येथील परिपत्रकानुसार शासकीय कार्यालयांना लागणाऱ्या गणवेष व इतर कापडाच्या पुरवठ्याचे काम महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळामार्फत करण्याबाबत सूचना निर्गमित केलेल्या आहेत. त्यानुषंगाने वस्त्रोद्योग विभागाच्या वाचा क्र. १ येथील शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाकडून कापड पुरवठा करण्याच्या संदर्भात वाचा क्रमांक १ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाकडून शासकीय/ निमशासकीय कार्यालयांना कापड पुरवठा करण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यपद्धती विहित करण्यात येत आहे:-

१) महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळाकडे नोंदणीकृत असलेल्या रासविनी योजनेंतर्गत ज्या यंत्रमाग सहकारी संस्थांना राज्य शासनामार्फत अर्थसहाय्य करण्यात आलेले आहे अशा संस्था व अन्य यंत्रमाग सहकारी संस्थांनी उत्पादित केलेल्या, तसेच लघु व सुक्ष्म उद्योगांतर्गत नोंदणी असलेल्या वस्त्रोद्योग घटकाकडून कापडाचा पुरवठा करावा.

२) कोणत्याही परिस्थितीत वरील क्रमांक १) मध्ये नमूद केलेल्या संस्थांशिवाय अन्य खाजगी व्यापाऱ्यांकडून कापडाची खरेदी करुन कापडाचा पुरवठा करण्यात येऊ नये.

३) वरील क्रमांक १) मध्ये नमूद केलेल्या संस्था त्यांनी उत्पादन केलेले कापड पुरवण्यास सक्षम नसल्यास अन्य स्त्रोताकडून कापड खरेदी करताना यंत्रमाग महामंडळाने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या उपरोक्त वाचा क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये कार्यवाही करावी.

४) वरील क्रमांक १) मध्ये नमूद केलेल्या रा.स.वि.नि. योजनेंतर्गत शासनातर्फे अर्थसहाय्य देण्यात आलेले आहे, अशा यंत्रमाग सहकारी संस्थांकडून कापड पुरवठा करुन घेतल्यानंतर यंत्रमाग महामंडळाकडून संबंधित संस्थांना देय असणाऱ्या रक्कमेतून १% रक्कम किंवा संबंधित संस्थेकडून वसुलीस पात्र असलेली रक्कम यापैकी जी कमी असेल ती रक्कम रा. स.वि.नि. कर्जाच्या परतफेडीप्रित्यर्थ महामंडळाने वळती करुन शासनखाती जमा करण्यात यावी.

५) वरील क्रमांक १) येथील सर्व संस्थांची उत्पादनक्षमता पाहून त्यांना उत्पादन क्षमतेच्या प्रमाणात जवळपास समप्रमाणात पुरवठ्याचे आदेश देण्यात यावेत. तसेच सर्व संस्थांना कापड पुरवठ्याचे आदेश प्राप्त व्हावेत यासाठी कापड पुरवठ्याचे आदेश देताना चक्रीय पद्धतीचा अवलंब करावा.

६) वरील क्रमांक १) मधील संस्थांचे नाव वापरुन अन्य स्त्रोताकडून कापडपुरवठा होऊ नये यासाठी वाहतूक विषयक तसेच अन्य दस्ताऐवज संबंधित संस्थांकडून यंत्रमाग महामंडळाने मागवून घ्यावेत व त्या दस्ताऐवजांची तपासणी काही पुरवठा प्रकरणांमध्ये महामंडळ स्तरावरुन करुन घ्यावी.

७) कापडाचा दर्जा शासकीय कार्यालये/ उपक्रमे यांनी सूचित केल्याप्रमाणे व शासनाने ठरवून दिलेल्या विर्निदेशाप्रमाणे राहील व विहित मुदतीत कापडाचा पुरवठा करण्यात येईल याची महामंडळाने दक्षता घ्यावी.

८) यंत्रमाग महामंडळाकडे परस्पर प्राप्त झालेल्या कापड मागण्यांसंदर्भात महामंडळस्तरावर प्रचलित नियमांनुसार कार्यवाही करण्यात यावी व अशा मागण्यांच्या अनुषंगाने केलेल्या कार्यवाहीचा तिमाही अहवाल महामंडळाने शासनास सादर करावा. तसेच, ज्या कापड पुरवठा मागण्या शासनास प्राप्त होतील त्याबाबत शासन स्तरावरुन यंत्रमाग महामंडळास पुढील कार्यवाहीसाठी कळविण्यात यावे.

वरील कार्यपद्धती तात्काळ अंमलात येत असून यंत्रमाग महामंडळाने शासकीय/ निमशासकीय कार्यालये व उपक्रमांना त्यांचे मागणीनुसार कापड पुरवठा करताना वरील कार्यपद्धतीचे काटेकोरपणे पालन करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१९१२०२१७०६३०६२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Gauri Rahul Mhaske

Digitally signed by Gauri Rahul Mhaske
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co Operation Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e3b06f24c3c5bb026c414c42f865f39144c21fb0f8c3a69c8e6e8dc2c5bb9ddd, serialNumber=b018ba858dd6b20cc7a84f6bc86a86d6a6e9ac3ac56c5dbfcd89f36c74de3e1f, cn=Gauri Rahul Mhaske
Date: 2019.12.02 17:09:25 +05'30'

**(गौरी.रा.म्हस्के)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,

**प्रति,**

१) मा. राज्यपाल महोदयांचे सचिव
२) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
३) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
४) मा. राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
५) सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व मंत्रालयीन विभाग
७) आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य यंत्रमाग महामंडळ मर्या., नवी मुंबई.
९) निवडनस्ती (टेक्स-२)